राज्यातील महानगर प्रदेश विकास प्राधिकरणांच्या कार्यक्षेत्रामध्ये उक्त प्राधिकरणांद्वारे आकारण्यात येत असलेल्या तडजोड/प्रशमन शुल्काच्या दराचे सुसुत्रीकरण करण्याच्या अनुषंगाने धोरण निश्चित करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमआरडी-३३२४/प्र.क्र.४८/नवि-७**
४था मजला, मुख्य इमारत,
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई -३२.
दिनांक: १५ मार्च, २०२४

**प्रस्तावना :-**

नगर विकास विभागाचा आदेश क्र. टिपीव्ही-४३९७/१८९९/प्र.क्र.२०१/९७/नवि-११, दि.१०.११.१९९७ व शासन निर्णय क्रमांक टिपीएस-१९१९/१७३/प्र.क्र.३८/१९/नवि-१३, दि.२७.०५.२०१९ अन्वये अनधिकृत बांधकामाचे तडजोड शुल्क (Compounding Charges) आकारुन विकासकांनी केलेला अपराध सामोपचाराने मिटविण्याविषयी महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना, अधिनियम, १९६६ चे कलम-१४३ अंतर्गत करण्यात आलेल्या तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात येते. सदरची कार्यवाही करताना नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी मंजूर केलेल्या वार्षिक बाजार मूल्यदर तक्त्यामधील बांधकामाचे दर/जमीन दर विचारात घेऊन तडजोड शुल्क (compounding charges) आकारणी करण्यात येते. तथापि, विविध नियोजन प्राधिकरणाअंतर्गत अनधिकृत बांधकामाच्या नियमितीकरणासाठी तडजोड शुल्क आकारणीचे दर भिन्न भिन्न आहेत. याबाबत राज्यातील महानगर प्रदेश विकास प्राधिकरणांच्या कार्यक्षेत्रामध्ये उक्त प्राधिकरणांद्वारे आकारण्यात येत असलेल्या तडजोड/प्रशमन शुल्काच्या दरामध्ये सुसुत्रीकरण असणे आवश्यक आहे. यासाठी धोरण निश्चित करण्यासाठी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय :-**

राज्यामध्ये कार्यरत महानगर प्रदेश विकास प्राधिकरण क्षेत्रांतर्गत प्राधिकरणांद्वारे आकारण्यात येणाऱ्या शुल्कामध्ये एकसुत्रीपणा असणे आवश्यक आहे. यासाठी धोरण निश्चित करण्याकरीता या शासन निर्णयाद्वारे खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे .

| | |
|---|---|
| १) अतिरिक्त महानगर आयुक्तमुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण , | अध्यक्ष |
| २) महानगर आयुक्तकोल्हापूर ,नागपूर ,औरंगाबाद ,नाशिक ,पुणे , | सदस्य |
| ३) संचालकपुणे ,मुल्यनिर्धारण व नगररचना , | सदस्य |
| ४) प्रमुख, नगर व क्षेत्र नियोजन विभागमहानगर प्रदेश विकास प्राधिकरण मुंबई , | सदस्य सचिव |

सदर समितीने प्राधिकरण क्षेत्रांतर्गत अनधिकृत बांधकामांचे नियमितीकरण करण्यासाठी आकारावयाचे तडजोड शुल्काचा दर निश्चित करण्यासाठी धोरण ठरवून १ महिन्याच्या कालावधीत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५२१३०५६१६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIJAY KARBHARI
CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2024.03.15 21:40:20 +05'30'

**(विजय चौधरी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) विभागीय आयुक्त, नाशिक, छत्रपती संभाजीनगर.
८) महानगर आयुक्त, मुंबई/पुणे/नाशिक/छत्रपती संभाजीनगर/नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण
९) महानगर आयुक्त, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपूर, कोल्हापूर
१०) अतिरिक्त महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण
११) संचालक, मुल्यनिर्धारण व नगररचना, पुणे
१२) सह सचिव तथा संचालक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) प्रमुख, नगर व क्षेत्र नियोजन विभाग, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण
१४) निवडनस्ती (नवि-७), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.